**प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे या रूग्णालयाची जागा ठाणे रेल्वेस्टेशनच्या विकासाकरीता ठाणे महानगरपालिकेस उपलब्ध करून देण्याबाबतच्या प्रस्तावाची तपासणी करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रामठा-२०१७/ प्र.क्र. ३३१/आ-३अ**
गो. ते. रूग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक: २९ ऑगस्ट, २०१८

**वाचा**

१) मुख्य सचिवांचे शिबिर कार्यालय, हैद्राबाद हाऊस, नागपुर, दिनांक १२ जुलै, २०१८ ची टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे या रूग्णालयाची जागा ठाणे रेल्वेस्टेशनच्या विकासाकरीता ठाणे महानगरपालिकेस उपलब्ध करून देण्याबाबतचा मंत्रिमंडळ प्रस्ताव दिनांक ५ जुलै, २०१८ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीसमोर विचारार्थ ठेवण्यात आला होता. सदर बैठकीमध्ये उपरोक्त प्रस्तावास तत्वत: मान्यता देण्यात आली तसेच या संदर्भात प्रस्तावाची तपासणी करण्यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात यावी व त्यामध्ये अपर मुख्य सचिव (वित्त), अपर मुख्य सचिव (महसुल), प्रधान सचिव (नगर विकास-२), प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य), प्रधान सचिव व विधी परामर्शी आणि आयुक्त, ठाणे महानगरपालिका यांचा समावेश करण्यास मान्यता देण्यात आली. सदर समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर याबाबत अंतिम निर्णय शासन मान्यतेने घेण्यास मान्यता देण्यात आली. त्यानुसार पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे या रूग्णालयाची जागा ठाणे रेल्वेस्टेशनच्या विकासाकरीता ठाणे महानगरपालिकेस उपलब्ध करून देण्याबाबतच्या प्रस्तावाची तपासणी करण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद | समितीवरील नियुक्ती |
|---|---|---|
| १ | मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (महसूल) | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (नगर विकास-२) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | प्रधान सचिव व विधी परामर्शी | सदस्य |
| ७ | आयुक्त, ठाणे महानगरपालिका | सदस्य |
| ८ | संबंधित सह सचिव, सा.आ.वि. | समन्वयक |

समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१. प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे या रूग्णालयाची जागा ठाणे रेल्वे स्टेशनच्या विकासाकरीता उपलब्ध करून देण्याबाबतच्या मंत्रिमंडळ प्रस्तावाबाबत मंत्रिमंडळाने प्रस्तावित जागा देण्याबाबतच्या प्रस्तावास तत्वत: मान्यता दिली असून या संदर्भातील प्रस्तावाची तपासणी करणे.

२. ठाणे रेल्वेस्टेशनच्या विकासाकरीता मनोरूग्णालय, ठाणे यांच्याकडील किती जागेची मागणी रेल्वे मंत्रालयाने केली आहे व किती जागा रेल्वे स्टेशनच्या विकासासाठी देणे आवश्यक आहे याबाबतची तपासणी करणे.

३. सदर प्रस्तावाबाबत वित्त विभाग, महसूल व वन विभाग, नगर विकास विभाग आणि विधी व न्याय विभाग यांचे अभिप्राय तसेच ठाणे महानगरपालिका व रेल्वे बोर्ड यांचे अभिप्राय विचारात घेऊन अहवाल तयार करणे.

४. सार्वजनिक आरोग्य विभागास मनोरूग्णालयाची नवीन इमारत, नवीन इमारत सुरू होईपर्यंतची सर्व प्रकारची पर्यायी व्यवस्था तसेच आरोग्य विभागाच्या अन्य रूग्णालयांच्या इमारतींचे बांधकाम ठाणे महानगरपालिकेकडून/एमएमआरडीए/सीडको सारख्या यंत्रणांकडून करून घेण्यासाठी आणि मनोरूग्णालयासाठी सुमारे १४.८३ एकर स्वतंत्र भूखंडाचे वाटप करणे इत्यादी बाबींवर आवश्यक उपाययोजना सूचविणे.

५. प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे येथील जागेच्या हस्तांतरणाबाबत मा.उच्च न्यायालयामध्ये दाखल असलेल्या जनहित याचिका/रिट याचिका याबाबत मा.उच्च न्यायालयाने दिलेले आदेश विचारात घेऊन सार्वजनिक हितासाठी जमिनीचे हस्तांतरण ठाणे रेल्वे स्टेशनच्या विकासासाठी करण्यास मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार, विधी व न्याय विभागाच्या अभिप्रायानुसार मा.उच्च न्यायालयामध्ये शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्याबाबत आणि मंत्रिमंडळाच्या निर्णयास मा.उच्च न्यायालयाची मान्यता घेण्यासाठी मा.उच्च न्यायालयामध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी मार्गदर्शन करणे.

६. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार मनोरूग्णालयाच्या जागेवरील अतिक्रमण हटविण्याबाबत तसेच दोन भूखंडावर केलेल्या अतिक्रमणातील झोपडपट्टी वासियांचे शासनाच्या धोरणानुसार पूनर्वसन करण्याबाबत मार्गदर्शन करणे.

७. उपरोक्त प्रस्तावावर विचार विनिमय करण्यासाठी शासकीय अधिकारी /रेल्वे बोर्डाचे अधिकरी यांना बैठकीसाठी निमंत्रित करण्याची समितीचे अध्यक्ष यांना मूभा राहील.

उपरोक्त समिती आपला अहवाल याबाबतच्या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात शासनास सादर करील. समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर जागेचे हस्तांतरण व अन्य बाबी याबाबतचा अंतिम निर्णय शासन मान्यतेने घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९१२०५३५२११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.08.29 14:52:48 +05'30'

**(रा.शा.कौरते)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
अपर मुख्य सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नगर विकास-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) सार्वजनिक आरोग्य विभाग,मुंबई.
आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
आयुक्त, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन मुंबई.
अतिरिक्त संचालक, (आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणार कार्यक्रम), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
सह सचिव, (रुग्णसेवा) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती, कार्यासन (आरोग्य -३ अ)